**राज्यातील सहकारी संघ व खाजगी दुध प्रकल्पांना दुध पुरवठा करणाऱ्या दूध उत्पादक शेतकऱ्यांना दुधासाठी प्रतिलिटर रू.५/- अनुदान देणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन
## कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके- २०२३/प्र.क्र.११५/पदुम-८(ई.क्र.७१६७५७)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

१. शासन निर्णय क्रमांकः एमएलके- २०२४/प्र.क्र.११५/पदुम-८, दि.५.१.२०२४
२. शासन निर्णय क्रमांकः एमएलके- २०२३/प्र.क्र.११५/पदुम-८, दि.२६.२.२०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्पांना दुध पुरवठा करणाऱ्या दूध उत्पादक शेतकऱ्यांना प्रतिलिटर रू.५/- अनुदान देण्याचा निर्णय संदर्भ क्र. १ येथील दि.५.१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. प्रस्तुत योजनेस संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

राज्यातील दुध उत्पादक शेतकऱ्यांचे आर्थिक हित जोपासण्यासाठी राज्यातील सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्पांना दुध पुरवठा करणाऱ्या दूध उत्पादक शेतकऱ्यांना प्रतिलिटर रू.५/- अनुदान योजनेचा जास्तीत जास्त दुध उत्पादक शेतकऱ्यांना लाभ मिळावा, याकरीता मा.मंत्रिमंडळाच्या दि.१३.३.२०२४ रोजीच्या बैठकीत चर्चा करण्यात आली. मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्पांमार्फत दुध उत्पादक शेतकरी यांना ३.५ फॅट /८.५ एसएनएफ या गुणप्रतिकरीता किमान रू.२७/- प्रतिलिटर ऐवजी किमान रू.२५/- प्रतिलिटर इतका दर संबंधित दुध उत्पादक शेतकऱ्यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रोख विरहीत पध्दतीने (ऑनलाईन) अदा करण्याबाबत मा.मंत्रिमंडळाने निदेश दिले आहेत.

मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या निदेशानुसार सदर दुध अनुदान योजनेतंर्गत सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्प यांच्यामार्फत दुध उत्पादक शेतकरी यांना किमान दुध दर रू.२५/- इतका अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक:-**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ हा "सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्पांमार्फत दुध उत्पादक शेतकरी यांना ३.५ फॅट /८.५ एसएनएफ या गुणप्रतिकरीता किमान रू.२७/- प्रतिलिटर इतका दर संबंधित दुध उत्पादक शेतकऱ्यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रोख विरहीत पध्दतीने (ऑनलाईन) अदा करणे बंधनकार राहील.तद्नंतर, शेतकऱ्यांना शासनामार्फत रू.५/- प्रतिलिटर बँक खात्यांवर थेट वर्ग (डीबीटी) करण्यात यावे." असा आहे.

**याऐवजी,**

"सहकारी दुध संघ व खाजगी दुध प्रकल्पांमार्फत दुध उत्पादक शेतकरी यांना ३.५ फॅट /८.५ एसएनएफ या गुणप्रतिकरीता किमान रू.२५/- प्रतिलिटर इतका दर संबंधित दुध उत्पादक शेतकऱ्यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रोख विरहीत पध्दतीने (ऑनलाईन) अदा करणे बंधनकार राहील.तद्नंतर, शेतकऱ्यांना शासनामार्फत रू.५/- प्रतिलिटर बँक खात्यांवर थेट वर्ग (डीबीटी) करण्यात यावे." **असे वाचण्यात यावे;**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१३५९४८०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2024.03.15 14:09:09 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री पदुम/मा. राज्यमंत्री पदुम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा, महाराष्ट्र राज्य
५. मा.विरोधी पक्षनेता,विधान परिषद , महाराष्ट्र राज्य
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य मंत्रालय,मुंबई
७. सचिव (पदु) यांचे स्वीय सहायक कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त,पशुसंवर्धन, पुणे महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. आयुक्त, दुग्ध व्यवसायविकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगांव,मुंबई
११.प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, सर्व
१२. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व
१३. प्रादेशिक दुग्ध व्यवसायविकास अधिकारी सर्व.
१४. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सर्व
१५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती/पदुम-८